पुस्तकी समायोजन - शिल्लक प्रवासी कराचे सवलतींच्या मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी पुस्तकी समायोजन करण्याबाबत. रु.१०७,८०,८७,७३६/-

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्र.एसटीसी-०७१८/प्र.क्र.४१४/परि-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ सप्टेंबर, २०१८.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि १, दिनांक २० जुन, २०००.
२) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ०८१४/प्र.क्र.४७८/परि १, दिनांक ४ जुलै, २०१५.
३) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ०९१७/प्र.क्र.५०३/परि १, दिनांक २८ मार्च, २०१८.
४) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प. महामंडळ यांचे पत्र क्र.राप/ लेखा/ नोंदणी/ १७९७, दि.१९.०७.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महामंडळाने विविध सामाजिक घटकांना प्रवासी भाड्यात दिलेल्या सवलत मुल्यापोटी येणाऱ्या खर्चाची प्रतिपुर्ती करण्यात येते. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाद्वारा १७.५ टक्के या दराने प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करण्यात येते. संदर्भाधिन क्र.१ येथील दि.२०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर प्रवासी करातील १२ टक्के प्रमाणे येणारी रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास उपलब्ध करुन देण्यात यावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तद्नंतर संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०४.०७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्य परिवहन महामंडळाने ७.५ टक्के प्रमाणे प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित १० टक्के प्रवासी कराची रक्कम शासनाचे भांडवली अंशदान म्हणून महामंडळाने समायोजित करावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे.

प्रवास सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीसाठी सन २०१८-१९ या अर्थसंकल्पीय वर्षाकरिता रु.१४५०.०० कोटी निधी अर्थसंकल्पीत आहे. त्यानुसार एप्रिल २०१८ ते जून २०१८ या कालावधीतील प्रवासी कराची रक्कम रु.१०७,८०,८७,७३६/- सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास विविध प्रवास सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी द्यावयाच्या शिल्लक रकमेपैकी एप्रिल २०१८ ते जून २०१८ या कालावधीतील महामंडळाकडुन शासनास येणे असलेली प्रवासी कराची एकुण रु.१०७,८०,८७,७३६/- (अक्षरी रुपये एकशे सात कोटी ऐंशी लाख सत्याऐंशी हजार सातशे छत्तीस फक्त) एवढ्या रकमेचे पुस्तकी समायोजन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१८-१९ च्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर रक्कम गृह विभाग, मागणी क्रमांक "बी-३, लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी खर्च दर्शवून ही रक्कम ००४२, माल व उतारुंवरील कर, ००, १०६ मालाच्या स्थानिक प्रवेशावरील कर, (०१) करवसूली, (०१) (०२) उतारुंवरील करापासून मिळालेल्या जमा रकमा (००४२ ००६२)" या लेखाशीर्षाखाली महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाकडून प्रवासी करापोटी जमा दर्शवून, पुस्तकी समायोजित करण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३०/२०१८/व्यय ८, दि.११.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२९१२५५००८६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Meghana Gaurav Shinde
Date: 2018.10.05 15:06:38 +05'30'

**(मेघना गौरव शिंदे)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत**,

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३. महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
४. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
९. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१०.संचालक, लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११/साऊ), मंत्रालय, मुंबई
१३. गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती/कार्यासन परि-१.